# हॅरियेट टबमन

## मुक्तीच्या वाटेवर



# हॅरियेट टबमन

## मुक्तीच्या वाटेवर

लेखक : रे बेन्स

चित्रे : लॅरी जॉनसन



मेरीलँड राज्याच्या चेसपीक खाडीचा पूर्व किनारी भाग अतिशय रमणीय होता. खाडीच्या पाण्यात विविध प्रकारचे मासे, शिंपले, कालवे आढळत. जंगलात ससा, हरीण, घूस, खार आणि इतर अनेक प्राणी राहात. तेथील सुपीक जमिनीत गहू, मका, तंबाखू आणि अनेक भाज्या पिकत.

अठराव्या शतकाच्या सुरुवातीस मेरीलँड हे वास्तव्यासाठी एक सुरेख ठिकाण होते – हो, फक्त त्यासाठी तुम्ही मुक्त असायला हवे. परंतु बेन रॉस आणि हॅरियेट ग्रीन हे दांपत्य स्वतंत्र नव्हते. ते एडवर्ड ब्रोडस नावाच्या एका शेतमालकाचे गुलाम होते. ते त्याच्या शेतात काम करत, लाकूडतोड करत आणि त्याच्या घरचीही कामे करत. मालक सांगेल ते काम त्यांना करावे लागे. त्यांच्या मुलांचीही स्थिती काही वेगळी नव्हती.

या गुलामांना मालमत्ता समजले जाई. म्हणजे ते मेंढरं, फर्निचर किंवा कापसाच्या गासड्यांसारखंच मालकाच्या मालमत्तेचा एक हिस्सा असत. मालक त्यांना कधीही कुणालाही विकू शकत होते. त्यांच्या मुलांना मालक दूर कुठेतरी पाठवू शकत होते. ते मुलांना मारहाण करू शकत होते. गुलामांना शिक्षण घेण्यास तसेच चर्चमध्ये जाण्यासही मनाई होती. गुलामांना कोणतेही हक्क नसल्याने त्यांच्या मालकांना काही शिक्षा होऊ शकत नव्हती.

1820 सालच्या आसपास एका अशा जगात हॅरियेट रॉसचा जन्म झाला. बेन रॉस आणि हॅरियेट ग्रीन यांच्या अकरा अपत्यांपैकी ती सहावे अपत्य होती. ते सगळे एकच खोली असलेल्या छोट्याशा झोपडीत राहात. या झोपडीची जमीन मातीची होती. झोपडीत ना खिडकी होती, ना फर्निचर!

त्यांच्याकडे झोपण्यासाठी साधा पलंगही नव्हता. जमिनीवरच कापडाच्या चिंध्या आणि जनावरांचा चारा पसरून त्यावर ते सर्व झोपत. जेवणासाठी त्यांच्याकडे भांडीकुंडी नव्हती. ते डाळ-वरणासारखे अन्न थेट कढईतून खोलगट दगडात किंवा शिंपल्याच्या तुकड्यात घेऊन खात. ते उभ्याउभ्या किंवा मातीच्या जमिनीवर बसून जेवत.



गुलामांच्या मुलांना मौजमजा करण्यासाठी आणि खेळण्यासाठी अजिबात वेळ नसे. स्वतःची रोजीरोटी कमावण्यासाठी त्यांना कामाला जुंपले जाई. लहान असताना हॅरियेट, ब्रोडस कुटुंबाचे निरोप देण्या-घेण्यासाठी भरपूर धावाधाव करू लागली. निरोप पोहोचवण्यासाठी ती दहा-दहा मैल पळत असे. कधी जंगलातून, कधी नदी किनाऱ्यावरून, कधी कच्च्या रस्त्यांवरून तिची ही दौड होत असे.



कुटुंबियांसोबत मात्र हॅरियेटचा वेळ खूप आनंदात जात असे. ते सर्व तिच्यावर खूप प्रेम करत. त्यामुळे संकटाच्या क्षणीसुद्धा तिला कुटुंबासोबत वेळ घालवणे आवडत असे. बऱ्याच वर्षांनंतर हॅरियेटने आपल्या कुटुंबियांचे हे ऋण फेडले. आपले सहा भाऊ आणि एका बहिणीसमवेत संपूर्ण कुटुंबाला ती उत्तर भागात मुक्त आयुष्य जगण्यासाठी घेऊन गेली. तिने त्या सर्वांची गुलामगिरीतून सुटका केली.

हॅरियेट पाच वर्षांची असताना तिला मालकाने एका नवीन कामावर नेमले. श्रीमती ब्रोडस यांनी तिला आपल्या मोठ्या बंगल्यात काम दिले. त्या छोट्या मुलीला घरकामाबद्दल काही जाण नव्हती. गुलामांच्या एका खोलीच्या झोपडीव्यतिरिक्त ती 'घर' म्हणता येईल अशा ठिकाणी कधी गेली नव्हती. बंगल्यात जी कामे तिला सांगितली जात ती कामे तिला कुणीच शिकवली नव्हती.

यात काही नवल नाही की कामे करताना हॅरियेट बऱ्याच चुका करत असे. चुका केल्यावर तिला त्याची शिक्षाही मिळत असे.

हॅरियेट सहा वर्षांची असताना ब्रोडस यांनी तिला कुक कुटुंबासोबत राहाण्यासाठी पाठवले. हे कुटुंब विणकरांचा व्यवसाय करत. त्यांचे घर ब्रोडस यांच्या शेतापासून खूप दूर होते. त्यामुळे हॅरियेटला ते पसंत नव्हते. पण हॅरियेटने विणकाम शिकून ब्रोडस कुटुंबियांसाठी कपडे शिवावेत, अशी ब्रोडस यांची इच्छा होती. त्यामुळे हॅरियेटला कुक कुटुंबाकडे जावे लागले.

कुक कुटुंबाकडेही हॅरियेटचे जीवन ब्रोडस यांच्या शेतापेक्षा काही वेगळे नव्हते. पण हॅरियेट तिथे जास्त काळ थांबली नाही. एकदा ती गोवरने आजारी असताना कुक यांनी तिला नदीकिनारी पाठवले. तिला त्यांच्या ससा अडकवणाऱ्या जाळ्याची तपासणी करण्यास सांगण्यात आले. या कामासाठी तिला बर्फासारख्या अतिशय थंड अशा वाहात्या पाण्यातून चालावे लागले.

पुढच्याच दिवशी हॅरियेट सर्दी आणि कणकण यांनी बेजार झाली. तिचे शरीर तापाने फणफणले आणि तिला कुठलेच काम झेपेनासे झाले. एका कोपऱ्यात बसून तिने हे सगळे सहन केले. तिच्या आजाराची बातमी वेगाने गुलामांमध्ये पसरली आणि शेवटी तिच्या आईपर्यंत पोहोचली.



हॅरियेटला पुन्हा घरी आणण्यासाठी तिने ब्रोडस कुटुंबाकडे आर्जवं केली. शेवटी श्रीयुत ब्रोडस यांनी ते मान्य केले. नाहीतरी आजारपणामुळे हॅरियेट कुक कुटुंबाकडे विणकाम शिकत नव्हती. त्यामुळे आत्ताच तिला परत आणले तर कुक कुटुंबाला तिला शिकवण्यासाठी पैसे तरी द्यावे लागणार नाहीत, असा विचार त्यांनी केला. त्यांनी हॅरियेटला परत बोलावले. मग तिच्या आईने तिची काळजी घेतली आणि हॅरियेट आजारातून बरी झाली.

मग हॅरियेटला श्रीमती ब्रोडस यांच्या तान्ह्या बाळाला सांभाळण्याचे काम दिले. काही वर्षांनंतर याबद्दल हॅरियेट एकदा म्हणाली, “माझ्यावर त्या तान्ह्या बाळाची जबाबदारी सोपवली तेव्हा मी फक्त सात वर्षांची होते. मी एवढी लहान होते की मला सतत जमिनीवर बसून बाळाला माझ्या कुशीत ठेवावे लागे. बाळाची झोपण्याची वेळ आणि आईकडे दूध पिण्याची वेळ सोडून इतर सर्व वेळ बाळ माझ्याच कुशीत असायचे.”

छोट्या हॅरियेटला अशी मोठी जबाबदारी पेलवत नसे. खेळण्यासाठी, एकटे राहाण्यासाठी तिच्याकडे वेळच उरत नसे. ब्रोडस दांपत्य तिच्यावर तीक्ष्ण नजर ठेवत आणि तिच्याशी कठोरपणे वागत. कामात कसूर झाली की मार मिळणार, हे हॅरियेट जाणत होती. गुलामांना अशाप्रकारची शिक्षा करणे ही तेव्हा एक सामान्य बाब होती.



शिक्षा करून मालक गुलामांना धाकात ठेवत. गुलामांनी प्रतिकार करू नये, उलट उत्तरे देऊ नयेत, पळून जाऊ नये असे मालकांना वाटत असे.

तरीही मालक गुलामांच्या मनातील असंतोष दडपू शकले नाहीत. अनेकदा काही गुलाम आपल्या हक्कांसाठी आवाज उठवत. बंधने झुगारून ते धार्मिक कार्यक्रमांचे आयोजन करत. लपून-छपून ते लिहा-वाचायला शिकत. मालकांपासून पळून उत्तर भागात जाणाऱ्या गुलामांना ते लपण्यासाठी जागा आणि अन्न पुरवून मदत करत.

दरवर्षी गुलामांच्या बंडांच्या बातम्या येत. मालकवर्ग या बातम्या दडपून टाकण्याचा प्रयत्न करत. अशा बातम्या ऐकून आपले गुलामसुद्धा बंड करतील अशी भीती त्यांना वाटे. तरीही अशा बातम्या फार काळ लपून राहात नसत. एका गुलामाकडून दुसऱ्याकडे, एका शेतावरून दुसरीकडे संपूर्ण दक्षिण भागात या बातम्या पसरत असत. आमचे गुलाम समाधानी आहेत, असे मालकवर्गाने एकमेकांना आणि जगाला कितीही ओरडून सांगितले तरी त्याने बंड होणे काही बंद झाले नाही. गुलामांना सत्य परिस्थिती ठाऊक होती.



लहानपणापासून हॅरियेट गुलामांच्या बंडांच्या कहाण्या ऐकून होती. तिने गॅब्रियल प्रॉसर नावाच्या गुलामाबद्दलही ऐकले होते. 1800 साली प्रॉसरने एक मोठा उठाव करण्याची योजना आखली होती. एक हजारापेक्षाही जास्त गुलाम त्याची साथ देण्यास तयार होते. पण शेवटच्या क्षणी एका फितुर गुलामाने शेतमालकांकडे ही बातमी फोडली आणि ही योजना अयशस्वी झाली.

हॅरियेटने डेन्मार्क वेसेबद्दलही ऐकले होते. ‘सर्व माणसे समान आहेत’ असे त्याचे म्हणणे होते. वेसे पूर्वी गुलाम होता पण आता एक स्वतंत्र निग्रो होता. तो दक्षिण कॅरोलिनातील हजारो गुलामांचा नेतासुद्धा होता. जून 1822 मध्ये वेसेचे समर्थक मुक्तीसाठी उठाव करण्यास तयार होते. पण काही भेकड गुलामांनी या योजनेची माहिती मालकांना दिली.

हॅरियेटने दक्षिण भागात होत असलेल्या अनेक छोट्यामोठ्या घडामोडींबद्दल ऐकले होते. यातून या लहान मुलीला एवढे उमगले की गुलामी प्रथा पसंत नसणारे आपल्यासारखेच असंख्य लोक आहेत. ती मनाशी म्हणे, “एक ना एक दिवस मी जरूर मुक्त होईन आणि जेव्हा तो दिवस उगवेल तेव्हा मी इतर गुलामांनाही मुक्त करेन.”



हॅरियेटने आपल्या भावना कुणापासून कधी लपवून ठेवल्या नाहीत. ती शेतातील इतर गुलामांशी निर्भयपणे याबद्दल बोलत असे. ब्रोडस कुटुंबासमोर ती चेहऱ्यावर ना कधी हास्य दाखवत असे, ना कधी आपण ब्रोडस कुटुंबात आनंदी आहोत असा आव आणत असे.



हॅरियेटच्या आईला सदैव तिची चिंता असे, “जर हॅरियेटने ब्रोडस पती-पत्नीला नाराज केलं आणि त्यांनी तिला गुलामांच्या व्यापाऱ्याला विकून टाकलं, तर! मग तो व्यापारी तिला दक्षिण भागात दूरवर कुठेतरी भात किंवा कापसाच्या शेतात कामाला लावेल.” मेरीलँडमध्ये गुलामांचे जीवन हलाखीचे होते. पण दूर दक्षिण भागात ते दहा पटीने कष्टाचे होते.

हॅरियेटचे स्वाभिमानी आणि फटकळ वर्तन श्रीमती ब्रोडस यांना अजिबात पसंत नव्हते. तिने या मुलीच्या आत्मविश्वासाला तडा द्यायचे ठरवले. तिने या नऊ वर्षांच्या मुलीला एका दुसऱ्या कुटुंबात काम करण्यास पाठवले. तिथे तिला दिवसभर घराची साफ-सफाई करावी लागे.

रात्री तिला तान्ह्या बाळाला सांभाळण्याचे काम करावे लागे. दररोज तिला विनाकारण काही शिक्षा मिळे. फक्त जिवंत राहाण्याइतपत खाणे-पिणे तिला देत असत.

काही काळानंतर हॅरियेटचे शरीर जणू हाडांचा सापळा बनला. काम करण्याइतपत शक्ती तिच्यात उरली नाही. तिची हिंमत संपली असे समजून त्या कुटुंबाने तिला पुन्हा ब्रोडस कुटुंबाकडे पाठवले. ती खूप अशक्त आणि निस्तेज दिसत होती. पण तिने आत्मविश्वास गमावला नव्हता. मनाने ती अजूनही कणखर होती.

हॅरियेट पुन्हा पहिल्यासारखी व्हावी म्हणून तिच्या आईवडिलांनी शक्य ते प्रयत्न केले. फुरसत मिळे तेव्हा हॅरियेटची आई तिची शुश्रुषा करत असे. या काळात बेनने तिला अनेक उपयुक्त जीवनाश्यक गोष्टी शिकवल्या. बेन कधी शाळेत गेला नव्हता, पण तो बुद्धिमान होता. त्याला निसर्गाची सखोल माहिती होती. पानगळीच्या दिवसांत जनावरांच्या शरीरावर जास्त केस उगवले तर कडाक्याची थंडी पडणार, हे त्याला कळत असे. नदीत कोणत्या भागात जास्त मासे मिळतील याचा अंदाज त्याला येत असे. कोणत्या रानटी वनस्पती खाण्यासाठी सुरक्षित आहेत, हे तो सांगू शकत असे. हॅरियेट थोडी चालू-फिरू लागल्यावर बेन तिला रविवारी दुपारी जंगलात नदीकिनारी फिरायला घेऊन जाऊ लागला.

हॅरियेटला आपल्या भावंडांकडूनही खूप उर्जा मिळत असे. दिवसभर तळपत्या उन्हात काम करून ते सगळे घरी परतत. घरी ते हॅरियेटला दिवसभरच्या घडामोडी सांगत, तिला गाणी गाऊन दाखवत, गोष्टी सांगत, विनोद सांगून तिला हसवत. आपल्या छोट्या बहिणीच्या चेहऱ्यावर हसू फुलवण्यासाठी ते सर्व काही करत.

हॅरियेटला तिच्या गाढ श्रद्धेतूनही उर्जा मिळत असे. गुलामांना स्वतःचे चर्च चालवण्यास मनाई होती. पण ते सर्व धार्मिक होते आणि दर रविवारी ते प्रार्थना सभा आयोजित करत. प्रत्येक शेतात एखाद्यातरी गुलामाला बायबलचे चांगले ज्ञान असे. अशाच व्यक्तिकडून इतर गुलाम बायबलमधील कथा आणि प्रार्थना शिकत.

गुलामांना बायबलमधील मोझेसची कथा सर्वात जास्त भावत असे. मोझेसने इस्रायलच्या लोकांना गुलामगिरीतून मुक्त केले होते. सर्व गुलाम प्रार्थना करत की त्यांनाही मुक्त करेल असा एक मोझेस मिळो.





हॅरियेटला गाढ विश्वास होता की गुलामांनाही चांगले दिवस येतील. आपण निश्चितच स्वतंत्र होऊ याबद्दल तिला खात्री वाटत असे. ईश्वर सर्व मनुष्यांना समान मानतो, या बायबलमधील वचनावर तिची श्रद्धा होती.

पुढील तीन वर्षांत हॅरियेट शरीराने आणि मनाने सुदृढ झाली. ती पूर्णपणे बरी झाल्यावर ब्रोडस यांनी तिला दुसऱ्या एका मालकाला भाड्याने दिले. नवा मालक तिच्याकडून प्रौढ गुलामांच्या क्षमतेची कठीण कामे करून घेऊ लागला. तिला लाकडे वाहून नेण्याची आणि लोखंडी रूळ कापण्याची मेहनतीची कामे करावी लागली. पण परिस्थिती सहनशक्तीच्या बाहेर गेल्यावरही तिने आपली हिंमत गमावली नाही.

अकरा वर्षांची होईपर्यंत हॅरियेट शरीराने मजबूत आणि धष्टपुष्ट झाली. ती कुणा प्रौढ माणसासारखंच खूप वेळ अंगमेहनत करु लागली. ब्रोडस यांनी तिची क्षमता बघितली आणि तिला शेतात काम करण्यास पाठवले. शेतात हॅरियेट इतर स्त्रियांसारखंच डोक्याला मोठा रुमाल बांधू लागली. पुढे आयुष्यभर तिने डोक्याला असा रुमाल बांधला.

हा रुमाल तिला आपल्या गुलामगिरीच्या जीवनाचे स्मरण करून देत असे. आपण त्या जीवनापासून किती दूर आलेलो आहोत, याचेही भान तिला येत असे.

1831 साली गुलामांसाठी अधिक कठोर नियम बनवण्यात आले. त्यानुसार गुलाम गट बनवून एकत्र येऊ शकत नव्हते, काम करताना त्यांना परस्परांशी बोलता येणार नव्हते, मालकाच्या परवानगीशिवाय त्यांना रस्त्यावर चालता येणार नव्हते. जुन्या नियमांनाही अधिक कठोर करण्यात आले. या सगळ्याला कारण होते, नॅट टर्नर या गुलामाच्या नेतृत्वाखाली झालेले बंड!

नॅट टर्नर व्हर्जिनिया राज्यातील गुलाम होता. 1831 सालच्या ग्रीष्म ऋतूत “मोझेस” म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या व्यक्तिने एका रक्तरंजित बंडात सत्तर गुलामांचे नेतृत्व केले. हे बंड मोडून काढण्यासाठी सशस्त्र सैन्य बोलवावे लागले. टर्नरला पकडण्यासाठी तीन महिने लागले.

व्हर्जिनियात बंड झाले म्हणजे ते कुठेही होऊ शकते, या चिंतेने मालकवर्ग घाबरला. म्हणूनच त्यांनी गुलामांचे नियम अधिक कठोर केले.





नॅट टर्नरने बऱ्याच गुलामांच्या मनात मुक्तीची मशाल पेटवली. हॅरियेट त्यांच्यापैकीच एक होती.

“नॅट टर्नरने जे केलं तेच मलाही करावसं वाटतंय. गुलाम म्हणून जगण्यापेक्षा मेलेलं बरं!” एके रात्री ती आपल्या कुटुंबियांना म्हणाली.

“मुक्त होऊन जगणं त्यापेक्षा बरं!” तिचा भाऊ विल्यम म्हणाला.

“पण हे कसं घडू शकतं? तुला माहितीय की मालक आपल्याला कधी मुक्त करणार नाही.” हॅरियेटने विचारले.

“तो काय करेल यापेक्षा आपण काय करायचं, ते बघ. अंडरग्राउंड रेलरोडवरून मुक्ती माहितीय का?”

“ते काय आहे?" हॅरियेटने विचारले.

विल्यमने हॅरियेटला टाइस डेव्हिड्सची गोष्ट सांगितली. केंटकी भागातील डेव्हिड्स हा गुलाम मालकाला सोडून पळून गेला. मालकाने त्याचा पाठलाग केला. डेव्हिड्सने ओहायो नदी पोहून पार केली. मालक दुसऱ्या किनाऱ्यावर पोहोचेपर्यंत टाइस डेव्हिड्स जणू काही हवेत विरून गेला होता.

खरंतर गुलामगिरी प्रथेचा तिरस्कार करणारे लोक त्याची मदत करत होते. पण मालकाला वाटले की तो गायब झाला. परतल्यावर मालक सर्वांना म्हणाला, "टाइस डेव्हिड्स एखाद्या गुप्त भूयारातून पसार झाला असावा."

ही गोष्ट एका कानाकडून दुसऱ्या कानाकडे पसरत गेली. गुलाम लोक मुक्तीच्या या भुयारी मार्गाबद्दल चर्चा करू लागले. पण दक्षिणेकडून उत्तरेला जाणारा असा कोणताही भुयारी रस्ता नव्हता. तरीही गुलाम एकमेकांना ही गोष्ट ऐकवत राहिले. कारण या गोष्टीत त्यांना आशेचा एक किरण दिसत असे.

याच काळात अमेरिकेत रेल्वेचे रुळ टाकण्यात येत होते. रेल्वेगाडीएवढ्या वेगाने धावणारे वाहन अद्याप लोकांनी पाहिले नव्हते. गुलामांनीही रेल्वेगाडीबद्दल ऐकले. लवकरच लोक 'भूमिगत रेल्वेमार्ग' (अंडरग्राउंड रेलरोड) बद्दल बोलू लागले, "ही रेल्वेगाडी गुलामांना जलदरित्या व सुरक्षितपणे उत्तर भागात घेऊन जाते."



15 वर्षांची असताना एका घटनेत हॅरियेट मरता मरता वाचली. सप्टेंबर महिन्यात एका सायंकाळी ती काही खरेदी करण्यासाठी गावातील एका दुकानात गेली. तिथे एक गुलाम धावत धावत आला. त्याचा मालक बॅरेटही मागोमाग आला आणि गुलामावर ओरडला, “परत चल शेतावर!”

गुलाम शांतपणे एकटक मालकाकडे बघत उभा राहिला. दुकानातील इतर लोकही स्तब्ध उभे होते.

“तुला चाबकाने फोडून काढेन,” बॅरेटने त्याला धमकावले. गुलाम त्याचे न ऐकता तिथून पळून जाऊ लागला. मालक पुन्हा त्याच्यावर किंचाळला, “ए थांब, थांब!” मग मालक हॅरियेट आणि तिच्याजवळ उभ्या असलेल्या एका मुलाला बोलला, “पकडा त्याला, त्याला दोरानेच बांधून ठेवतो.”

हॅरियेटने मालकाचे ऐकले नाही आणि त्या मुलालाही काही न करण्यास खुणावले.

मग तो गुलाम अचानक दरवाजाकडे पळाला. बॅरेटने चटकन एक लोखंडाचे भारी वजन उचलून त्याच्यावर फेकले. पण त्याचा नेम चुकला आणि ते वजन हॅरियेटच्या डोक्यावर जाऊन आदळले. ती क्षणार्धात जमिनीवर पडली आणि बेशुद्ध झाली.





पुढचे दोन-तीन महिने हॅरियेट मृत्यूशी झुंजत होती. काही काळ ती अन्नही खाऊ शकत नव्हती. त्यामुळे ती अगदी अशक्त आणि बारीक झाली. अधिकांश वेळ ती झोपून राहात असे. तिच्या कपाळावर झालेली जखम खोल होती. त्यामुळे जखम हळूहळू भरू लागली तरी त्याचा घाव मात्र तसाच राहिला. हॅरियेट बरी झाल्यावरही या जखमेची खूण आयुष्यभर तिच्यासोबत राहिली.

ब्रोडस यांना वाटले की हॅरियेट काही जिवंत राहात नाही. त्यामुळे ते तिला विकून टाकण्याचा प्रयत्न करू लागले. कित्येकदा ते गुलामांच्या खरेदीदारांना हॅरियेटच्या झोपडीत घेऊन जात. चिंध्यांच्या ढिगावर झोपलेल्या हॅरियेटला पाहून प्रत्येक खरेदीदार म्हणे, “ही जिवंत राहिली तरी काही काम करू शकणार नाही. हिच्यासाठी मी तुम्हाला एक छदामही देणार नाही.”



हिवाळा ऋतू आला तेव्हा हॅरियेट जिवंतच होती. तिच्या आईवडीलांनी ईश्वराचे आभार मानले. पण त्यांना सतत तिची काळजी वाटू लागली. हॅरियेट आता चालू-फिरू आणि बोलूही लागली होती. घरातील छोटी-मोठी कामेही ती करत होती. पण कित्येकदा काही करता-करता ती मध्येच झोपू लागली.

बऱ्याचदा बोलता-बोलता हॅरियेट अचानक डोळे बंद करून झोपून जात असे. मग जाग आल्यावर काहीच न झाल्यासारखं पुन्हा बोलायला सुरुवात करत असे.

हॅरियेटच्या अशा झटक्यांमुळे, ती वेडी झाली आहे असे ब्रोडस कुटुंबाला वाटू लागले. त्यामुळे ते तिला विकण्याची घाई करू लागले. हॅरियेटला आपल्या कुटुंबापासून दूर जायचे नव्हते. ती वेडी झाली नव्हती उलट खूप हुशार होती.

ब्रोडस एखाद्या खरेदीदाराला घेऊन हॅरियेटच्या झोपडीत आले की हॅरियेट वेडाचा झटका आल्याचे नाटक करू लागली. काही वेळा ती मुद्दाम मूर्खासारखे वागू लागली. तिचे कुटुंबीयसुद्धा ती जणू वेडीच असल्याचा देखावा करू लागले. त्यामुळे कुणीही तिला खरेदी करण्यास तयार झाले नाही.

काळासोबत हॅरियेटची तब्येत सुधारू लागली. तिच्या अंगातील ताकद वाढू लागली. ती भारी वजन सहजपणे उचलू लागली. सामानाने लादलेली गाडी ती दूरपर्यंत खेचून नेऊ लागली. ती शेतात बैलांना हाकू लागली आणि दिवसभर नांगरणी करू लागली. संपूर्ण मेरीलँडमध्ये ती कुणा पुरुषापेक्षाही जास्त ताकदवान आहे, असे लोक म्हणू लागले. हीच ताकद पुढे तिला मुक्त होण्याच्या कामी आली.

हॅरियेटने मुक्त होण्याचे स्वप्न काही काळ बाजूला ठेवले होते. 1844 साली तिने जॉन टबमन या मुक्त नीग्रो माणसाशी लग्न केले. जॉनने तिला मुक्त उत्तर भागात पळून जाण्यात साथ द्यावी, असे तिला वाटे. पण तिचे वैवाहिक जीवन आनंदी नव्हते. काही काळाने दोघे वेगळे झाले. हॅरियेटने टबमन हे नाव मात्र कायम ठेवले.

दरम्यान, ब्रोडस कुटुंब त्यांच्या अनेक गुलामांना विकणार, ही बातमी गुलामांपर्यंत पोहोचली. त्यामुळे हॅरियेटने मुक्त होण्यासाठी प्रयत्न सुरू केले. तिने जवळच राहाणाऱ्या एका गोऱ्या महिलेची मदत घेण्याचे ठरवले. ही महिला एकदा हॅरियेटला म्हणाली होती, “काही मदत लागली तर विश्वासाने माझ्याकडे ये.” ती मुक्तीबाबत बोलतेय, याचा अंदाज हॅरियेटला तिच्या बोलण्यावरून आला होता.





हॅरियेट गुपचुप बकटाऊन येथे राहाणाऱ्या त्या गोऱ्या महिलेकडे निघाली. तिथे पोहोचल्यावर ती त्या महिलेला म्हणाली, “तुम्ही म्हणाला होता की मदत लागली तर ये. आता मला मदतीची गरज आहे.”

त्या महिलेने हॅरियेटला एक कागद दिला. त्यावर दोन नावे लिहिली होती. पहिल्या घरात पोहोचण्याचा मार्गही त्यावर दाखवला होता. त्या घरी तिला पुढील मदत मिळणार होती.

कागदावर दाखवल्यानुसार हॅरियेट पहिल्या घरात पोहोचली. तिने त्या घरच्या महिलेला तो कागद दाखवला. महिलेने हॅरियेटला झाडूने अंगणातील केरकचरा काढण्याचे काम दिले. यामुळे हॅरियेट ही मालकापासून पळून चाललेली गुलाम आहे, असा संशय कुणी घेऊ शकणार नव्हते.



त्या महिलेचा पती संध्याकाळी शेतावरचे काम आटपून घरी परतला. अंधारात त्याने आपल्या गाडीवर काही सामान लादले आणि हॅरियेटला त्या सामानामध्ये लपवले. मग गाडी घेऊन तो दुसऱ्या एका शहराकडे निघाला. तिथे पोहोचल्यावर त्याने हॅरियेटला उतरवले आणि पुढील “स्टेशन”वर पोहोचवले.

अशा प्रकारे हॅरियेट “अंडरग्राउंड रेलरोड” द्वारे एका स्टेशनवरून दुसऱ्या स्टेशनवर प्रवास करत राहिली. अखेरीस पेनसिल्व्हेनिया शहरात पोहोचल्यावर तिने मुक्तीचा मोकळा श्वास घेतला. बऱ्याच वर्षांनी ही घटना आठवल्यावर हॅरियेट म्हणाली, “मी गुलामगिरीचा प्रदेश सोडून मुक्त जगात प्रवेश केला आहे, यावर माझा विश्वासच बसेना. मी आपल्या हातांकडे पाहिलं, काय मी तीच व्यक्ती आहे? एकाएकी मला जग खूप सुंदर वाटू लागलं. सूर्याची सोनेरी किरणं झाडांच्या फांद्यांमधून चाळून निघून संपूर्ण शेतावर पसरली होती. मनात आलं, मी स्वर्गात तर नाही ना!”

पण हॅरियेटच्या या स्वर्गात त्रुटी होत्या. ती म्हणते, “मी मुक्त जरूर झाले, पण इथे मी पूर्णपणे अनोळखी होते. माझे स्वागत करायला इथे कुणी नव्हते. माझे आईवडील, भावंडं, मित्रपरिवार हे माझं सर्वस्व मेरीलँडमध्ये होतं. मी मुक्त झाले तसं त्यांनीही मुक्त व्हायला हवं. मी या उत्तर भागात आधी माझं घर वसवेन आणि मग त्या सर्वांना इथे आणेन.”

पुढच्या काही वर्षांत हॅरियेट आपला जीव धोक्यात घालून अनेकदा दक्षिण भागात गेली. तिथून गुलाम असलेल्या आपल्या कुटुंबियांना, नातलगांना, मित्रांना ती उत्तर भागात घेऊन आली आणि त्यांनाही मुक्तीचा आनंद मिळवून दिला. तीनशेपेक्षाही जास्त गुलाम स्त्री-पुरुषांची आणि मुलांची हॅरियेटमुळे गुलामगिरीतून सुटका झाली.

हॅरियेट गुलामांमध्ये बरीच लोकप्रिय झाली. ते तिला 'मोझेस' म्हणू लागले. कारण तिने त्या सर्वांना गुलामगिरीच्या जोखडातून मुक्त केले होते. गुलामांचे मालक मात्र हॅरियेटचा तिरस्कार करू लागले. त्यांनी हॅरियेटला पकडून देण्यासाठी 40,000 डॉलर एवढे इनाम जाहीर केले.

पण हॅरियेटला कुणीही पकडू शकले नाही. ती "अंडरग्राउंड रेलरोड"ची अत्यंत हुशार "कंडक्टर" होती. ती म्हणते, "माझी रेलगाडी रुळांवरून कधी घसरली नाही आणि रेलगाडीतला प्रवासीही कधी हरवला नाही."

अमेरिकन गृहयुद्धात हॅरियेटने महत्त्वाची भूमिका बजावली. ती अमेरिकन संघाच्या बाजूने स्काउट आणि गुप्तहेर बनून शत्रुच्या भागात गेली आणि शत्रुवर मागून हल्ले केले. नर्स बनून तिने उत्तर तसेच दक्षिण भागातील जखमी, आजारी सैनिकांची शुश्रुषा केली.

गृहयुद्धानंतर हॅरियेट न्यूयॉर्कमधील ऑबर्न भागात राहू लागली. तिथेही आपले सेवाभावी कार्य तिने सुरू ठेवले. 10 मार्च 1913 रोजी मृत्यू होईपर्यंत या मोझेसने अनेक उल्लेखनीय कामे केली. स्त्रियांना मताधिकार मिळावा म्हणून तिने संघर्ष केला. नीग्रो मुलांसाठी तिने शाळा चालवल्या. वृद्ध, अनाथ आणि असहाय लोकांसाठी शक्य होईल ती मदत तिने केली.





वयाच्या त्र्याण्णव्या वर्षी हॅरियेट टबमनचे निधन झाले. तिला सैनिकांनी मानवंदना दिली. ज्या महिलेने आपल्या लोकांना स्वतंत्र करण्यासाठी एवढ्या हालअपेष्टा सोसल्या तिच्यासाठी ही निश्चितच एक योग्य श्रद्धांजली होती.

समाप्त